**विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक व जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी यांच्या ४२ पदांच्या मानधनासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२४/प्र.क्र.६६/आव्यप्र-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑगस्ट, २०२४

वाचा:- या विभागाचा दि.१५ मे,२०२४ रोजीचा शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१५/प्र.क्र.७५/आव्यप्र-१.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक - ६ पदे व जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी - ३६ पदे असे एकूण ४२ पदे कंत्राटी तत्वावर निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदांना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये दि. ०२ नोव्हेंबर, २०२३ ते दि. ३० सप्टेंबर,२०२४ या ११ महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

या पदांचे माहे जुलै, २०२४ ते सप्टेंबर २०२४ या ३ महिन्यांचे प्रतिमाह रु. ४५,०००/- याप्रमाणे एकूण रु. ५६,७०,०००/- (रुपये छपन्न लक्ष सत्तर हजार फक्त) इतके मानधन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) विभागीय आयुक्तांना वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्यात आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी कंत्राटी तत्वावर निर्माण करण्यात आलेल्या आणि कार्यरत असलेल्या ६ विभागीय आपत्ती व्यवस्थापन समन्वयक व ३६ जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी अशा एकूण ४२ पदांचे प्रतिमाह रु. ४५,०००/- याप्रमाणे माहे जुलै, २०२४ ते सप्टेंबर, २०२४ या ३ महिन्यांचे एकूण रु. ५६,७०,०००/- (रुपये छपन्न लक्ष सत्तर हजार फक्त) इतके मानधन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) आयुक्त यांच्यामार्फत जिल्ह्यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | वितरीत करण्यात आलेला निधी |
|---|---|---|
| १ | कोकण (८ पदे) | १०,८०,०००/- |
| २ | पुणे (६ पदे) | ८,१०,०००/- |
| ३ | नाशिक (६ पदे) | ८,१०,०००/- |
| ४ | औरंगाबाद (९ पदे) | १२,१५,०००/- |
| ५ | अमरावती (६ पदे) | ८,१०,०००/- |
| ६ | नागपूर ( ७ पदे) | ९,४५,०००/- |
| | **एकूण** | **५६,७०,०००/-** |

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) १० § कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८२९१७४०२७०९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.08.29 17:56:37 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) विभागीय आयुक्त (सर्व).
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) जिल्हाधिकारी (सर्व)
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव (आ.व्य., म. व पु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती/ आव्यप्र-१.